**<u>नवीन लेखाशीर्ष उघडण्याबाबत</u>**

**महाराष्ट्र राज्याचे नवीन माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण-२०२३ अंतर्गत माहिती तंत्रज्ञान उद्योगासाठी “क्रिटीकल पायाभूत सुविधा निधी” करिता नवीन लेखाशीर्ष उघडण्याबाबत......**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग ,ऊर्जा ,कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय क्र. मातंधो २०२३/प्र.क्र १३१/उद्योग-२**
मादाम कामा मार्ग ,हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई ४०००३२.
दिनांक : १६ मे, २०२५

**<u>शासन निर्णय :-</u>**

महाराष्ट्र राज्याचे नवीन माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा धोरण- २०२३ हे दिनांक २७ जून २०२३ च्या शासन निर्णयान्वये जाहीर करण्यात आले आहे. सदर शासन निर्णयातील परि. ४.३ मध्ये “राज्य शासन खाजगी माहिती तंत्रज्ञान उद्यानाकडून या धोरणातील तरतूदीनुसार अतिरिक्त चटई क्षेत्र निर्देशांकापोटी मिळणाऱ्या अधिमूल्याच्या रकमेचा माहिती तंत्रज्ञान आणि माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा उद्योगांकरीता क्रिटीकल पायाभूत सुविधा निधी या एका स्वतंत्र निधीची निर्मिती करतील व या निधीचा विनियोग केवळ माहिती तंत्रज्ञान उद्योगासाठी आवश्यक असणाऱ्या पायाभूत सुविधा निर्माण करण्यासाठीच करण्यात येईल.” अशी तरतूद करण्यात आली आहे.

२. तद्अनुषंगाने, माहिती तंत्रज्ञान आणि माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा उद्योगांकरीता “क्रिटीकल पायाभूत सुविधा निधी” उभारण्याकरीता स्वतंत्र लेखाशिर्ष उघडण्यास शासन याद्वारे मंजूरी देत आहे.

| **माहिती तंत्रज्ञान व माहिती तंत्रज्ञान सहाय्यभूत सेवा उद्योगाकरिता क्रिटीकल पायाभूत सुविधा निधी** | | |
|---|---|---|
| | **मराठी** | **English** |
| मागणी क्र. | के-०७ | K-07 |
| मुख्य लेखाशीर्ष | २८५२,उद्योग | 2852,Industries |
| उप मुख्यलेखाशीर्ष | ८०-सर्वसाधारण | 80- General |
| गौणशीर्ष | १०४ औद्योगिक प्रोत्साहन | 104-Industrial Promotion |
| गटशीर्ष | ०२- क्रिटीकल पायाभूत सुविधा निधी | 02- Critical Infrastructure Facility Fund |
| उपगटशीर्ष | (०२)(०१) क्रिटीकल पायाभूत सुविधा निधीसाठी राज्य शासनाचे योगदान (कार्यक्रम) | (02) (01) Contribution of State Government for Critical Infrastructure Facility Fund (Scheme) |
| उद्दिष्ट | ३१-सहायक अनुदान (वेतनेतर) ( २८५२A०९६) | 31- Grant in Aid (Non Salary) CRC- 2852A096 |

३. सदर आदेश प्रधान महालेखापाल,लेखा व अनुज्ञेयता, मुंबई यांच्या No KV/CHA-I/IE&LD/UOR -291/2024-25/2291 रोजीच्या टिप्पणीन्वये दिलेल्या मान्यतेने तसेच वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. १५५/२२५/व्यय-१६, दि. २४/०४/२०२५ अन्वये सल्लामसलत करुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०५१६१२४४५५५२१० असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNITA AJAY HAZARI

Digitally signed by SUNITA AJAY HAZARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRY ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=902bffd437652eee8f65932190c71d2b5cd1778714d082db09d1994383cce843, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E3B30CC02C8FF1BDF9FCDCD3B2536AF5C8ADFD05E9D409FAE0A032DDB4385717, cn=SUNITA AJAY HAZARI
Date: 2025.05.16 12:46:20 +05'30'

**( सुनिता हजारी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत -**

१. विकास आयुक्त (उद्योग),उद्योग संचालनालय,मुंबई
२. मुख्य कार्यकारी अधिकारी ,महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ ,मुंबई.

३. महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा, (मुंबई/नागपूर)
४.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
६.विक्रीकर आयुक्त, विक्रिकर भवन, मुंबई
७.वित्त विभाग (अर्थ-१४/व्यय-१६), मंत्रालय,मुंबई
८.कार्यासन अधिकारी (प्रशासन-१),उद्योग,ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग,मंत्रालय,मुंबई
९.निवडनस्ती, संग्रहार्थ